**प्रधानमंत्री पीक विमा योजना खरीप हंगाम सन २०१८ साठी राज्य शासनाच्या हिश्याची पिक विमा हप्ता अनुदानापोटी रु.६५२,५८,१४,०८२/- इतकी रक्कम विमा कंपनीस वितरीत करण्यासाठी मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रपिवियो-२०१८/प्र.क्र.५२/११ अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: २८ नोव्हेंबर, २०१८

वाचा -

१. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९ /अर्थ-३, दि.०२.०४.२०१८
२. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१८/प्र.क्र.५२/११- अे, दि.२४.०५.२०१८
३. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१८/प्र.क्र.५२/११- अे, दि.१३.०६.२०१८
४. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१७/प्र.क्र.२१८/११- अे, दि.०५.०७.२०१८
५. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१७/प्र.क्र.१६५/११- अे, दि.०४.१०.२०१८
६. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१७/प्र.क्र.२१८/११- अे, दि.२९.१०.२०१८
७. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. सां/८.वि.ह.अनु./ ६५३/ २०१८, दि.२७.११.२०१८

**प्रस्तावना :-**

प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप २०१८ मध्ये राज्यात दि.२४.०५.२०१८ व दि.१३.०६.२०१८ च्या शासन निर्णयान्वये भारतीय कृषि विमा कंपनी, ओरिएन्टल जनरल इंशुरन्स कंपनी, आयसीआयसीआय लोम्बार्ड कंपनी व इफको टोकियो जनरल इंशुरन्स कंपनी या ४ विमा कंपन्यांमार्फत राबविण्यात येत आहे. भारतीय कृषि विमा कंपनी ही राज्यात विमा कंपन्यांची समन्वयक कंपनी आहे. भारतीय कृषि विमा कंपनीने प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप हंगाम २०१८ अंतर्गत उपरोक्त ४ कंपन्यांचा एकत्रित मिळून पिक विमा हप्ता अनुदानापोटी राज्य शासन हिश्याच्या रक्कमेपोटी रु.१६०६,५४,०६,०१५ /- इतक्या रकमेची मागणी केलेली आहे. तथापि, केंद्र शासनाच्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांमधील मुद्दा क्र. १३.२.३ नुसार, "चालु हंगामातील नोंदणी सुरु असतानाच विमा संरक्षित क्षेत्राची आकडेवारी उपलब्ध नसली तरीदेखील केंद्र व राज्य शासनाचा विमा हप्ता हिस्सा अग्रीम स्वरुपात (पहिला हप्ता) कंपनीस अदा करणे आवश्यक आहे. सदर विमा हप्ता अनुदानाची रक्कम मागील हंगामाच्या अदा केलेल्या एकुण राज्य हिस्सा विमा हप्ता अनुदानाच्या ८० टक्क्याच्या ५० टक्के रक्कम आगाऊ स्वरुपात कंपन्यांना द्यावी" असे नमूद आहे. त्यानुषंगाने प्रस्तुत प्रकरणी रु.६५२,५८,१४,०८२/- इतकी रक्कम पिक विमा हप्ता अनुदानापोटी राज्य शासन हिश्याच्या स्वरुपात अनुज्ञेय होत असून सदरची रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप हंगाम २०१८ अंतर्गत भारतीय कृषि विमा विमा कंपनीने सादर केलेली मागणी, कृषि आयुक्तालयाची शिफारस आणि केंद्र शासनाच्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांमधील मुद्दा क्र. १३.२.३ या बाबींचा विचार करता विमा कंपन्यांना त्यांनी मागणी केलेल्या एकुण रु.१६०६,५४,०६,०१५ /- इतक्या राज्य हिस्सा पिक विमा हप्ता अनुदानापैकी रु.६५२,५८,१४,०८२/- इतके अनुदान राज्य शासनास अनुज्ञेय होत असल्याने विमा कंपन्यांना पिक विमा हप्ता अनुदानाच्या राज्य

हिश्याची रु.६५२,५८,१४,०८२/- इतकी रक्कम खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | विमा कंपनी | खरीप हंगाम २०१८ मध्ये सहभागी विमा कंपनीकडून मागणी केलेले पीक विमा हप्ता राज्य हिस्सा अनुदान | खरीप २०१७ मधील राज्य हिस्सा विमा हप्ता अनुदान | केंद्र शासनाच्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांनुसार अदा करावयाचे अनुदान (खरीप २०१७ च्या ८० टक्केच्या ५० टक्के) |
|---|---|---|---|---|
| १ | भारतीय कृषि विमा कंपनी | २५१,४०,७६,३५६/- | ३०६,७१,५५,६२६/- | १२२,६८,६२,२५०/- |
| २ | आयसीआयसीआय लोम्बार्ड कंपनी | २९६,५५,७५,९७८/- | २४९,६५,१६,२३७/- | ९९,८६,०६४,९५/- |
| ३ | इफको टोकियो जनरल इंशुरन्स कंपनी | ६४४,२४,४४,८५६/- | ६०७,३२,७८,१६२/- | २४२,९३,११,२६५ |
| ४ | ओरिएन्टल जनरल इंशुरन्स कंपनी | ४१४,३३,०८,८२५/- | ४६७,७५,८५,१८१/- | १८७,१०,३४,०७२/- |
| **एकुण** | | **१६०६,५४,०६,०१५ /-** | **१६३१,४५,३५,२०५/-** | **६५२,५८,१४,०८२/-** |

२. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा :-

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११०, पीक विमा (००) (०८) प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत विमा हप्त्यासाठी अर्थसहाय्य राज्य हिस्सा (२४०१ A ६६४) योजनेतर**

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहायक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर कृषि संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/ अर्थ-३, अन्वये दि.०२.०४.२०१८ प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२८१६५८१९०४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
Date: 2018.11.28 17:05:11 +05'30'

(अ.वि.जोशी)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२

३. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०.महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
११.वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई- ३२
१२.उप सचिव (११-अे /२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१३.कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१४.विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, स्टॉक एक्सचेंज टॉवर्स, २० वा मजला, दलाल स्ट्रीट,फोर्ट, मुंबई-४०० ०२३
१५.निवड नस्ती (कार्यासन ११-अे).